बैलगाडा शर्यतीमुळे दाखल करण्यात आलेले खटले मागे घेण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पीआरओ-०२२२/प्र.क्र.२०/विशा-२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १३ एप्रिल, २०२२.

**वाचा** :
१. गृह विभाग, शासन निर्णय क्र.पीआरओ-०११४/प्र.क्र.१२०/विशा-२, दि.१४/०३/२०१६.
२. गृह विभाग, शासन निर्णय क्र.पीआरओ-०११४/प्र.क्र.१२०/विशा-२, दि.१६/१२/२०२०.
३. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन परिपत्रक क्र.पविआ-१०१७/प्र.क्र.१६२/पदमु-३, दि.२१/१२/२०२१.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण भागामध्ये पावसाळ्यानंतर शेतीची कामे संपल्यावर गावोगावीच्या यात्रांना सुरुवात होते. या यात्रा मनोरंजनांसाठी, खेळीमेळीचे आणि उत्साहाचे वातावरण ठेवण्याकरीता शेतकरी पारंपरिक पध्दतीने बैलगाडा या क्रीडा स्पर्धांचे आयोजन करतात. बैलगाडा शर्यतीच्या या प्रकाराला फार जुनी परंपरा आहे. बैलगाडा शर्यतींच्या आयोजनामुळे ग्रामीण भागातील लहान मोठे व्यावसायीक या शर्यतीशी जोडले जातात, त्यातून होणाऱ्या उलाढालीमुळे या सर्वांना एक उत्पन्नाचे साधन उपलब्ध होते. बैलगाडा शर्यतीमध्ये विजयी झालेल्या बैलगाडा मालकांना आकर्षक बक्षिसे दिली जातात. ग्रामीण भागातील बैलांच्या मालकांसाठी ही अत्यंत प्रतिष्ठेची बाब समजली जाते. बैलगाडा शर्यतीमध्ये शर्यतीसाठी लागणारे चांगल्या जातीचे खिलार /बैल यांची मोठ्या प्रमाणावर खरेदी विक्री होते. राज्यातील बराचसा भाग हा दुष्काळी असल्यामुळे या भागात बैलगाडा शर्यतीमुळे देशांतर्गत पर्यटनालाही चालना मिळते.

२. बैलगाडा शर्यतीस परवानगी देण्यासंदर्भात, केंद्र शासनाच्या, "प्राण्यांना क्रुरतेने वागविण्यास प्रतिबंध करण्याबाबतच्या अधिनियम, १९६०" मध्ये " सन २०१७ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४५" अन्वये सुधारणा करण्यात आली असून, सदर अधिनियम दि.३१/०७/२०१७ रोजी राजपत्रात प्रसिध्द करण्यात आला आहे. तथापी, राज्यातील प्राणीमित्र संघटनांनी बैलगाडा शर्यतीमध्ये बैलांना वेगाने धावण्यासाठी बैलगाडा मालकांकडून क्रुरतेने वागणूक दिली जाते म्हणून राज्यात बैलगाडा शर्यतीवर बंदी घालावी यासाठी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे जनहित याचिका क्रमांक २३१३२/२०१७ दाखल केली होती. त्यावर मा. उच्च न्यायालयाने दि.१६/०८/२०१७ व दि.११/१०/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाने शासन परिपत्रक क्रमांक- पविआ-१०१७/ प्र.क्र.१६२/पदुम-३, दि.१०/११/२०१७ व्दारे पुढील आदेश होईपर्यंत बैलगाडा शर्यतीस परवानगी देण्यात येऊ नये असे आदेश निर्गमित केले होते.

३. बैलगाडा शर्यतीसंदर्भात मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका क्रमांक ३५२६ व ३५२७/२०१८ दाखल केली आहे. त्याचप्रमाणे कर्नाटक व तामिळनाडू या राज्यांनी देखील यासंदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका दाखल केल्या आहेत. यासंदर्भात केंद्र शासनाच्या प्राण्यांना क्रुरतेने वागविण्यास प्रतिबंध करण्याबाबत अधिनियम, १९६०, मध्ये केलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल झालेल्या सर्व विशेष अनुमती याचिका मा. सर्वोच्च न्यायालयाच्या घटनापीठापुढे निर्णयासाठी ठेवल्या आहेत. सदर घटनापीठाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून राज्यात बैलगाडा शर्यती विहित अटी व शर्तीचे पालन करुन सुरु करण्यास मा. सर्वोच्च न्यायालयाने दि.१६/१२/२०२१ च्या निर्णयान्वये मंजुरी दिली आहे. या निर्णयाच्या अनुषंगाने कृषी व पदुम विभागाने शासन परिपत्रक क्रमांक- पविआ-१०१७/प्र.क्र.१६२/ पदुम-३, दि.२१/१२/२०२१ अन्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या घटनापीठाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून बैलगाडा शर्यतीचे विहित अटी व शर्तीचे पालन करुन बैलगाडा शर्यत सुरु करण्यास परवानगी दिली आहे.

४. राज्यातील बैलगाडा मालक, बैलगाडा शर्यतीचे आयोजक, बैलगाडा शर्यतीचे प्रेक्षक, यांच्यावर कायद्याचे उल्लंघन केल्यामुळे अनेक ठिकाणी खटले दाखल करण्यात आले आहेत. सदर खटले मागे घेण्याबाबत लोकप्रतिनिधींकडून शासनाकडे मागणी करण्यात येत आहे. या प्रकरणी दोषारोपपत्र दाखल झालेले खटले मागे घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्यात बैलगाडा शर्यतीचे आयोजन करण्यास बंदी असतांना बैलगाडा शर्यतीचे आयोजन केल्यामुळे दाखल खटले मागे घेण्यास तत्वत: मान्यता देण्यात येत आहे. अशा खटल्यांवर खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून क्षेत्रिय स्तरावरील पोलीस आयुक्त व जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने प्रकरणपरत्वे कार्यवाही करावी.

अ) अशा घटनेत जिवीत हानी झालेली नसावी,

ब) अशा घटनेत खाजगी व सार्वजनिक मालमत्तेचे रु.५,००,०००/- पेक्षा जास्त नुकसान झालेले नसावे.

२. तसेच बैलगाडा शर्यतीचे आयोजन करण्यास परवानगी मिळावी यासाठी विविध ठिकाणी आंदोलने झाली त्यानुषंगाने दाखल खटले, गृह विभाग, शासन निर्णय क्र. पीआरओ-०११४/प्र.क्र.१२०/विशा-२, दि.१४/०३/२०१६ मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दती नुसार मागे घेण्याची कार्यवाही करावी.

३. सदर खटले मागे घेताना मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (दिवाणी) (Civil) क्रमांक ६९९/२०१६ (अश्विनी कुमार उपाध्याय विरुध्द युनियन ऑफ इंडिया व इतर) मध्ये दि.१०/०८/२०२१ रोजी दिलेल्या निर्देशामध्ये ज्या खटल्यांमध्ये विद्यमान व माजी खासदार व आमदार यांचा समावेश आहे, असे खटले मा. उच्च न्यायालयाच्या संमतीशिवाय मागे घेण्यात येऊ नयेत. विद्यमान व माजी खासदार व आमदार यांचा ज्या खटल्यात समावेश आहे ते खटले मागे घेणे योग्य असल्याचे क्षेत्रिय समितीचे मत झाल्यास समितीने त्याबाबत शिफारस करुन मा. उच्च न्यायालयाकडे तशी विनंती करणे आवश्यक राहील.

४. पोलीस आयुक्त व जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने बैलगाडा शर्यतीचे संदर्भात दोषारोपपत्र दाखल झालेले खटले मागे घेताना खालील कार्यपध्दती अनुसरावी.

अ) ज्या खटल्यात जिवीत हानी झालेली नाही व खाजगी अथवा सार्वजनिक मालमत्तेचे रु.५,००,०००/- पेक्षा जास्त नुकसान झालेले नसेल अशा सर्व खटल्यांचा समितीने आढावा घ्यावा व शासन निर्णयात नमूद केलेल्या निकषाप्रमाणे प्रकरण तपासून खटले मागे घेण्याबाबत कार्यवाही करावी.

ब) मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (दिवाणी) (Civil) क्रमांक ६९९/२०१६ (अश्विनी कुमार उपाध्याय विरुध्द युनियन ऑफ इंडिया व इतर) मध्ये दि.१०/०८/२०२१ रोजी दिलेल्या निर्देशामध्ये ज्या खटल्यांमध्ये विद्यमान व माजी खासदार व आमदार यांचा समावेश आहे, असे खटले मा. उच्च न्यायालयाच्या संमतीशिवाय मागे घेण्यात येऊ नये, असे निर्देश दिले आहेत. या निर्देशास अनुसरुन विद्यमान व माजी खासदार व आमदार यांचा ज्या खटल्यात समावेश आहे ते खटले मागे घेणे योग्य असल्याचे क्षेत्रिय समितीचे मत झाल्यास समितीने त्याबाबत शिफारस करुन मा. उच्च न्यायालयाकडे तशी विनंती करावी.

क) मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्रमांक ६९९/२०१६ (अश्विनी कुमार उपाध्याय विरुध्द युनियन ऑफ इंडिया व इतर) या न्यायालयीन प्रकरणी दिलेल्या निर्देशाचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

ड) सदर खटल्यांबाबत समितीने बैठकीत घेतलेल्या निर्णयाचा अहवाल शासनास सादर करावा.

इ) ज्या खटल्यात सार्वजनिक मालमत्तेचे रु.५,००,०००/- पेक्षा कमी नुकसान झाले असेल असे खटले मागे घेण्याबाबत समितीचे मत झाल्यास समितीच्या सदस्य सचिवांनी संबंधितास त्याबाबत कळवावे. सदर नुकसान भरपाईची रक्कम भरणेबाबत त्यांची लेखी संमती असल्यास सदर खटले मागे घेण्याबाबत समितीने शिफारस करावी.

ई) एखाद्या खटल्यात एका पेक्षा अधिक व्यक्तींचा सहभाग असल्यास सार्वजनिक मालमत्तेच्या नुकसानीची रक्कम समप्रमाणात अथवा सर्वसहमतीने वसुल करण्यात यावी. नुकसान भरपाईची रक्कम भरली याचा अर्थ गुन्हा सिध्द झाला किंवा मान्य झाला असा लावण्यात येऊ नये.

उ) समितीने खटला मागे घेण्याची शिफारस केल्यानंतर संबंधित सरकारी अभियोक्त्याने तात्काळ सदर शिफारस विहित मार्गाने मा. न्यायालयाच्या निदर्शनास आणावी व त्याबाबत तात्काळ समितीस व संचालक, अभियोग संचालनालय यांना कळवावे.

ऊ) समितीच्या शिफारशींवर मा.न्यायालयाने दिलेल्या निर्णयाची माहिती संबंधित सरकारी अभियोक्त्याने तातडीने समितीस व संचालक, अभियोग संचालनालय यांना कळवावी. अभियोग संचालनालयाने राज्यातील एकत्रित माहिती शासनास तातडीने सादर करावी.

५. राजकीय व सामाजिक आंदोलनामध्ये खाजगी व सार्वजनिक मालमत्तेच्या झालेल्या नुकसान भरपाईची वसुल केलेली रक्कम खालील लेखाशिर्षाखाली जमा करावी.

“ ०५५- पोलीस
१००-पोलीस
१०३-फी, दंड व जप्तीच्या रक्कमा
०२- नुकसान भरपाई
(०२)(०१) राजकीय व सामाजिक आंदोलनात झालेली सार्वजनिक व खाजगी मालमत्तेची नुकसान भरपाई (००५५०३६२) ”

६. सदर शासन निर्णयात नमूद केलेल्या कार्यपध्दतीची सर्व संबंधितांनी काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

७. सदर शासन निर्णय विधी व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०/Withdrawal/ Confl./ A॰Branch/२०२२, दि.०८/०३/२०२२ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०४१८१२००४१७१२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH GANPAT DESHMUKH

Digitally signed by PRAKASH GANPAT DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a2023a0ab760cd894a2dbe530b17c6d82f1bdc0c3543072e60d70efe328c9bc2, pseudonym=D4961104132618 71F9749D900206D92788E45943, serialNumber=AA75BD353F4DF463119A0887B43C329C3364A4D90AFD1A5F153D6604AB536DDB, cn=PRAKASH GANPAT DESHMUKH
Date: 2022.04.18 12:03:37 +05'30'

**( प्र. ग. देशमुख )**
सह सचिव, गृह विभाग.

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे) यांचे खाजगी सचिव
६. मा. राज्यमंत्री (गृह) (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे

११. प्रधान सचिव, (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
१३. प्रधान सचिव (कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग) मंत्रालय, मुंबई.
१४. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (५ प्रती)
१५. सचिव, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ५ प्रती)
१६. सर्व जिल्हादंडाधिकारी
१७. सर्व पोलीस आयुक्त (लोहमार्गासह)/ सर्व पोलीस अधीक्षक/ सर्व अतिरिक्त जिल्हा पोलीस अधीक्षक/ सर्व पोलीस सह / उप आयुक्त (गुन्हे)
१८. संचालक, सरकारी अभियोक्ता संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१९. सर्व सहायक संचालक व सरकारी अभियोक्ता.
२०. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. अध्यक्ष,इंडियन नॅशनल कॉंग्रेस,महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस(आय)समिती,टिळक भवन,काकासाहेब गाडगीळ मार्ग,दादर, मुंबई
२२. अध्यक्ष,नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई
२३. अध्यक्ष,भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी. डी. ओ.बॅरेक नं. १, योगक्षेमसमोर, वसंतराव भगवान चौक, नरिमन पॉईंट, मुंबई
२४. अध्यक्ष, भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई
२५. अध्यक्ष, भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई
२६. अध्यक्ष, राष्ट्रीय जनता दल (से.), एल. आय. सी. इमारतीसमोर, मुंबई
२७. अध्यक्ष, बहुजन समाज पार्टी, डी -१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई
२८. अध्यक्ष, शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई
२९. अध्यक्ष,महाराष्ट्र नवनिर्माण सेना,राजगड,२०२,मातोश्री टॉवर,दुसरा मजला,पद्माबाई ठक्कर मार्ग, माटुंगा(प.), मुंबई
३०. निवडनस्ती (का. विशा - २).